

# श्रीशांकर स्तोत्ररसावली

विद्यावाचस्पती
प्रा. स्वानंद गजानन पुंड
९८२२६४४६११

३६) श्री आनंद लहरी- १

भवानि स्तोतुं त्वां प्रभवति चतुर्भिनं वदनैः प्रजानामीशानस्त्रिपुरमथनः पंचभिरपि।
न षड्भिः सेनानीर्दशशतमुखैरप्यहिपति- स्तदान्येषां केषां कथय कथमस्मिन्नवसरः।।१।।

जगज्जननी माँ त्रिपुरसुंदरी आदिशक्तीचे स्तवन करताना भगवान जगद्गुरु आदि शंकराचार्य महाराज ज्या अपूर्व आनंदाचा अनुभव घेत आहेत त्या आधारे त्यांनी या स्तोत्राचे आनंदलहरी असेच नामकरण केले आहे.

आई जगदंबेचे स्तवन नेमके कसे करावे? हा त्यांच्यासमोर आलेला पहिला प्रश्न आहे. का पडला असावा हा प्रश्न? आचार्यश्रीच त्याचे उत्तर देतांना कारणमीमांसा करतात,

भवानि स्तोतुं त्वां प्रभवति चतुर्भिनं वदनैः- ते म्हणतात, आई ! तुझी स्तुती करण्यास भगवान श्री ब्रह्मदेव देखील समर्थ नाहीत. हे सांगताना आचार्य श्रीनी मुद्दाम ब्रह्मदेवांच्या चार मुखांचे वर्णन केले. चार वदनांनी त्यांनाही संभव नाही. मग सामान्यांची काय दशा? असा त्यामागील भाव आहे.

पुढे ही मुखसंख्या आणखीन वाढवत आचार्यश्री म्हणतात, 'प्रजानामीशानस्त्रिपुरमथनः पंचभिरपि 'चार मुखांचे ब्रह्मदेव नव्हे तर सकल प्रजेचे अधिपती असणारे, त्रिपुरासुराचा विनाश करणारे, पंचमुखधारी भगवान शंकर देखील असमर्थ आहेत.

न षड्भिः सेनानी- हे दोघेच नाही तर सहा मुख असणारे सेनानी अर्थात देवसेनापती भगवान षडानन स्कंद, कार्तिकेय देखील तुझ्या गुणगानात हतबल आहेत. इतकेच काय तर, दशशतमुखैरप्यहिपति - दश शत अर्थात हजार मुखांनी युक्त असणारे अहिपती अर्थात भगवान शेष आपल्या हजार मुखांनी आणि दोन हजार जिभांनी, आई जगदंबेच्या वैभवाचे गुणगान करण्यास असमर्थ आहे.

तदान्येषां केषां कथय कथमस्मिन्नवसरः ! मग इतर कोणाला याबाबतीत अवसरच कुठे आहे? अर्थात इतर कोणाला ते जमेल कसे? असे म्हणून आचार्य श्री आई जगदंबेला शरण जात आहेत.

तुझ्या गुणवर्णनासाठी तूच शक्ती दे अशी प्रार्थना करीत आहेत.



# श्रीशांकर स्तोत्ररसावली

विद्यावाचस्पती
प्रा. स्वानंद गजानन पुंड
९८२२६४४६११

३७) श्री आनंदलहरी २ घृतक्षीरद्राक्षामधुमधुरिमा कैरपि पदै-

विंशिष्यानाख्येयो भवति रसनामात्रविषय:।
तथा ते सौन्दर्यं परमशिवदृङ्मात्रविषय:
कथंकारं ब्रूम: सकलनिगमागोचरगुणे !!२!!

भगवान जगद्गुरु आदि शंकराचार्य स्वामी महाराजांनी आई जगदंबेच्या गुणांचे वर्णन करण्याचा संकल्प तर केला. पण त्यांची पंचाईत झाली आहे की हे वर्णन करावे तरी कसे?

गुणांचे वर्णन तर फार लांब झाले. साधे सौंदर्याचे वर्णनही संभव नाही. साधे सौंदर्याचे यासाठी म्हटले की ते प्रथम दृष्टीस पडते. गुण खूप नंतर कळतात.

आई जगदंबेच्या सौंदर्याचे वर्णन का करता येत नाही? तर आचार्य श्री म्हणतात, घृत अर्थात तूप, क्षीर अर्थात दूध, द्राक्ष अर्थात फळांचा रस, मधू अर्थात मध या सर्व गोष्टींचा गोडवा कोणत्या शब्दात वर्णन करणार?

हे सर्व पदार्थ विशेष रूपात अनाख्येय अर्थात न सांगता येणारे आहेत. कारण ते केवळ रसनेचा विषय आहेत. अर्थात त्यांचा केवळ अनुभव घेता येतो वर्णन करता येत नाही.

वर्णन करते जीभ. जीभ ही अशी अद्भुत आहे की रसना रूपात ती ज्ञानेंद्रियात आहे आणि जिव्हा रूपात कर्मेंद्रियातही.

पण तरी तिची अडचण पहा कशी आहे? दोन्हीकडे असणारी ती, या पदार्थांची चव ती स्वत: घेत असली तरी त्या चवीचे कोणतेच वर्णन तिला करता येत नाही.

स्वत: अनुभवलेल्या गोष्टींची जर ही अवस्था असेल तर डोळ्यांनी पाहिलेल्या सौंदर्याचे ती काय वर्णन करणार? तो तिच्या अनुभवाचा विषयच नाही. त्याबद्दल ती काय सांगणार?

त्यातही ते सौंदर्य सामान्य नाही. बाह्य जड पदार्थाचे नाही. सामान्य स्त्रीच्या सौंदर्याचा विषय नाही

आचार्य श्री म्हणतात,

'परमशिवदृङ्मात्रविषय:' अर्थात आई जगदंबेच्या सौंदर्याचा अंतपार फक्त भगवान शिवांनाच लागू शकतो.

सकल निगम अर्थात वेद, शास्त्रांनाही जिचे गुण अगोचर आहेत अशा हे जगदंबे मी तुझ्या गुणांचे वर्णन करू तरी कसे?

'शब्दात वर्णन करताच येत नाही', अशा शब्दातच ते जगदंबेच्या गुणातीतत्वाचे वर्णन करीत आहेत. केवळ वंदन करीत आहेत.



# श्रीशांकर स्तोत्ररसावली

विद्यावाचस्पती
प्रा. स्वानंद गजानन पुंड
९८२२६४४६११

३८) श्री आनंदलहरी ३

मुखे ते ताम्बूलं नयनयुगले कज्जलकला !
ललाटे काश्मीरं विलसति गले मौक्तिकलता।
स्फुरत्कांची शाटी पृथुकटितटे हाटकमयी !
भजामि त्वां गौरीं नगपतिकिशोरीमविरतम् ।।३।।

जरी परिपूर्ण वर्णनाची अडचण असली तरी जगद्गुरु आदि शंकराचार्य स्वामी महाराज आई जगदंबेच्या एकेका गोष्टी चे वर्णन करीत आहेत.

मुखे ते ताम्बूलं - आई तुझ्या मुखात तांबूल शोभून दिसतो. स्नान, विलेपन, अलंकार परिधान या सगळ्यानंतर भोजन केले जाते. त्यानंतर तांबूल भक्षण. अर्थात तो अंतर्बाह्य तृप्ततेचे प्रतीक आहे.

नयनयुगले कज्जलकला- अर्थात आईच्या दोन्ही डोळ्यात काजळाची रेष शोभून दिसत आहे.

ललाटे काश्मीरं- आईने कपाळावर केशर आणि कस्तुरीचा टिळा धारण केला आहे. केशर कश्मीर मध्ये तयार होते. तर कस्तुरी त्याच्याही पलीकडे असणाऱ्या हिमालयात आढळणाऱ्या कस्तुरी मृगां पासून मिळते. त्यामुळेच या दोन्ही पदार्थांना काश्मिर अर्थात कश्मीरमध्ये मिळणारे, असे म्हटले आहे.

विलसति गले मौक्तिकलता- अर्थात आई जगदंबेच्या गळ्यात मोत्यांच्या अनेक माळा लटकत आहेत.

स्फुरत्कांची शाटी पृथुकटितटे हाटकमयी - पृथुकटीतट अर्थात विशाल अशा कमरेच्या किनाऱ्यावर , स्फुरत अर्थात लखलखणारी, हाटकमयी म्हणजे सोन्यापासून निर्माण केलेली, रत्नजडित कांची म्हणजे मेखला कंबरपट्टा याने युक्त अशी शाटिका अर्थात साडी जगदंबेने परिधान केली आहे.

शेवटच्या ओळीत आचार्यश्री म्हणतात, नग म्हणजे पर्वत. त्यांचा पती म्हणजे राजा. अर्थात हिमालय. त्या हिमालयाची कन्या असणाऱ्या, हे नगपतिकिशोरी ! हे गौरी मी अविरत अर्थात अखंड तुझे भजन करतो.



# श्रीशांकर स्तोत्ररसावली

विद्यावाचस्पती
प्रा. स्वानंद गजानन पुंड
९८२२६४४६११

३९ श्री आनंदलहरी ४

विराजन्मन्दारद्रुमकुसुमहारस्तनतटी
नदद्वीणानादश्रवणविलसत्कुण्डलगुणा।
नतांगी मातंगीरुचिरगतिभंगी भगवती
सती शम्भोरम्भोरुहचटुलचक्षुर्विजयते।।४।।

विराजन्मन्दारद्रुमकुसुमहारस्तनतटी- आई जगदंबेच्या गळ्यात मंदार पुष्पांचा माळा असतात. मंदार म्हणजे पांढरी रुई. याला शास्त्रात कल्पवृक्ष म्हटले आहे. हा स्वर्गीय वृक्ष. त्याच्या फुलांच्या माळा आईच्या गळ्यात शोभून दिसत आहेत.

नदद्वीणानादश्रवणविलसत्कुण्डलगुणा- नदद्वीणा अर्थात नाद करीत असलेल्या वीणा. त्या वीणेचा दिव्य नाद तो नदद्वीणानाद. कुंडलांनी सुशोभित असणाऱ्या कानांनी आई जगदंबा त्या नादाला ऐकत बसली आहे.

नतांगी- नत म्हणजे नम्र. आई जगदंबा परमशक्तीशाली असून देखील त्या शक्तीने उन्मत्त नाही. शक्ती आणि नम्रता यांचा अद्वितीय संगम आईच्या ठाई आहे.

मातंगी- दशमहाविद्यां मध्ये आई जगदंबेचे एक रूप मातंगी वर्णिले आहे. मतंग ऋषींच्या आश्रमात प्रकटल्यामुळे हे नाव प्राप्त झाले. वाणीची आणि सुख शांतीची देवता आहे देवी मातंगी.

रुचिरगतिभंगी- आई जगदंबा चालते त्यावेळी तिच्या भारदस्तपणामुळे ती मध्येच थांबत थांबत पुढे जाते. त्यामुळे तिचा होणारा गतिभंग हा अत्यंत रुचीर, रमणीय, सुंदर आहे अशी.

भगवती- भग शब्दाचा अर्थ आहे तेज. तेजाने युक्त ती भगवती.

सती शंभो:- भगवान शंकरांची प्रियतमा असणारी.

अम्भोरुहचटुलचक्षु- अंभ म्हणजे पाणी. त्यात निर्माण होते ते अंभोरूह म्हणजे कमळ. त्या कमळाची जशी मोहक हालचाल असते आणि जसे मनोहरी सौंदर्य असते तसे जिचे चक्षु म्हणजे नेत्र आहेत ती अम्भोरुहचटुलचक्षु.

अशा जगदंबेचा विजय असो.



# श्रीशांकर स्तोत्ररसावली

विद्यावाचस्पती
प्रा. स्वानंद गजानन पुंड
९८२२६४४६११

४०) श्री आनंदलहरी ५

नवीनार्कभ्राजन्मणिकनकभूषापरिकरै-
वृताङ्गी सारङ्गीरुचिरनयनाङ्गीकृतशिवा।
तडित्पीता पीताम्बरललितमञ्जीरसुभगा
ममापर्णा पूर्णा निरवधिसुखैरस्तु सुमुखी।।५।।

सौंदर्य म्हटले की अनिवार्यपणे ज्यांचा विचार येतो ती म्हणजे आभूषणे. आई जगदंबेच्या अशा दिव्य दागिन्यांचे वैभव वर्णन करताना आचार्यश्री म्हणतात, नवीनार्क अर्थात् नुकताच उगवलेला म्हणजे सूर्य. त्याचे भ्राज म्हणजे तेज,चकाकी हा त्या दागिन्यांचा स्थायीभाव आहे. नुकताच उगवलेला सूर्य म्हणतांना तेजस्विता तर अपेक्षित आहे पण दाहकता नाही.

अशा आल्हाददायक तेजाने युक्त असलेले मणी म्हणजे रत्न आणि कनक म्हणजे सोने यांनी युक्त असणाऱ्या आभूषणांनी जिचे अंग वेढलेले आहे अशी ती 'नवीनार्कभ्राजन्मणिकनकभूषापरिकरै-
वृताङ्गी'.

सारङ्गि - सारंग शब्दाच्या अनेक अर्थांपैकी आहे एक अर्थ आहे हरीण. त्याच्या समान डोळे असणारी ती सारंगी.

अशी हरिणी प्रमाणे रुचिर अर्थात सुंदर डोळ्यांनी ती जगदंबा भगवान शंकरांकडे पाहत राहते. त्यामुळे तिला 'सारङ्गीरुचिरनयनाङ्गीकृतशिवा ' असे म्हणतात.

तडित्पीतापीताम्बर- तडित् अर्थात विद्युत. त्या विजेप्रमाणे पिवळ्याधमक रंगाच्या आणि चकाकणाऱ्या पीतांबरांने आई शोभून दिसत आहे. ललितमञ्जीरसुभगा- ललित अर्थात अत्यंत सुंदर. मंजिर म्हणजे पैंजण. त्याने सुभगा अर्थात भाग्यशालीनी असणारी ती ललितमञ्जीरसुभगा.

अपर्णा माझे पान देखील न खाता भगवान शंकराची उपासना करणारी.

ती परीपूर्ण, सुमुखी निरवधी अर्थात तत्काळ सुखप्रदान करणारी होवो.



# श्रीशांकर स्तोत्ररसावली

विद्यावाचस्पती
प्रा. स्वानंद गजानन पुंड
९८२२६४४६११

४१) श्री आनंद लहरी- ६

हिमाद्रेः संभूता सुललितकरैः पल्लवयुता
सुपुष्पा मुक्ताभिर्भ्रमरकलिता चालकभरैः।
कृतस्थाणुस्थाना कुचफलनता सूक्तिसरसा
रुजां हन्त्री गन्त्री विलसति चिदानन्दलतिका!!६!!

हिमाद्रेः संभूता- हिम म्हणजे बर्फ. अद्री म्हणजे पर्वत. बर्फाने आच्छादलेला पर्वत म्हणजे हिमालय. त्या पर्वतराजा पासून जन्माला आलेली, कन्या. त्यामुळे हिमाद्रेः संभूता.

सुललितकरैः पल्लवयुता- सुललित म्हणजे अत्यंत मनोहारी. लोभस. पल्लवयुता अर्थात वेल. कर म्हणजे हात. वेलीप्रमाणे नाजूक, लोभस, मनोहारी हातांनी युक्त असणारी. सामान्यतः हात दोनच असतात. पण आई जगदंबेचे स्वरूप अष्टभुजा, दशभुजा असते. त्यामुळे येथे कर शब्दाचे बहुवचन आले आहे.

सुपुष्पा मुक्ताभिर्भ्रमरकलिता चालकभरैः- सपुष्पा फुलांनी फुलवलेला. मुक्ता म्हणजे मोत्यांनी सजवलेला. भ्रमरकलिता म्हणजे त्या फुलां मुळे तथा आईच्या अंगभूत सुगंधाने आकृष्ट झालेल्या भुंग्यांच्या रांगांनी युक्त असलेला, अलकभर म्हणजे केशसंभार. यांने युक्त असलेली ती

सुपुष्पा मुक्ताभिर्भ्रमरकलिता चालकभरा .

कृतस्थाणुस्थाना- स्थाणू अर्थात अविचल. भगवान शंकरांना स्थाणू असे म्हणतात. त्यांना जी स्थान अर्थात बसण्याची जागा करते, अर्थात त्यांच्या मांडीवर विराजमान असते तिला कृतस्थाणुस्थाना म्हणतात.

कुचफलनता- हृदयस्थ अमृतभाराने झुकलेली.

सूक्तिसरसा- स्तोत्राचा रसग्रहण करणारी

रुजां हन्त्री- सकल रोगांना दूर करणारी.

गन्त्री- गमनशीला. चैतन्यमयी.

विलसति- शोभायमान. अतीव सुंदर.

चिदानन्दलतिका- चित् म्हणजे चैतन्य, ज्ञान आणि आनंद यांची जणू लतिका म्हणजे वेल. भक्तांना या गोष्टी पुरविणारी.

- अशी माझी आई जगदंबा आहे.



# श्रीशांकर स्तोत्ररसावली

विद्यावाचस्पती
प्रा. स्वानंद गजानन पुंड
९८२२६४४६११

४२) श्री आनंद लहरी -७

सपर्णामाकीर्णां कतिपयगुणैः सादरमिह
श्रयन्त्यन्ये वल्लीं मम तु मतिरेवं विलसति।
अपर्णैका सेव्या जगति सकलैर्यत्परिवृतः
पुराणोऽपि स्थाणुः फलति किल कैवल्यपदवीम्!!७!!

आई जगदंबेच्या अपर्णा नावाचा विचार करीत आचार्यश्रींनी इथे एका वेगळ्याच पद्धतीने आईचा गौरव केला आहे.

सपर्णामाकीर्णां कतिपयगुणैः- सपर्णा अर्थात पानांनी लदबलेली. त्यासोबत अनेक गुणांनी आकीर्णा अर्थात संपन्न असलेली. इथे पानांचा संबंध वेली सोबत असल्याने अन्य गुण म्हणजे फुलांचे गुच्छ किंवा फळांचे भार.

सादरमिह
श्रयन्त्यन्ये वल्लीं- अशा वेलीला सामान्य लोक अत्यंत आदराने, प्रेमाने शरण जातात.

अर्थात अशा प्रकारे पाने, फुले, फळे देणाऱ्या वृक्षांना, वेलींनाच लोक पसंत करतात. अशा वेलीच्या आश्रयाला जातात.

मम तु मतिरेवं विलसति - पण या जगरहाटीच्या विरुद्ध जात आचार्यश्री म्हणतात, पण माझी बुद्धी तर असे सांगते.....

अपर्णैका सेव्या जगति सकलै- या जगात सगळ्यांना एक अपर्णाच सेवायोग्य आहे.

आई पार्वतीने भगवान शंकरांची आराधना करताना झाडाचे पान सुद्धा न खाण्याचे व्रत केले होते. त्यामुळे तिला अपर्णा असे म्हणतात.

आचार्य या अपर्णा शब्दावरून सामान्य जगातील कल्पवल्ली सोबत तुलना करीत त्या सपर्णा वेली पेक्षा ही अपर्णा श्रेष्ठ आहे हेच सांगत आहेत.

यत्परिवृतः
पुराणोऽपि स्थाणुः फलति किल कैवल्यपदवीम् - तिचे श्रेष्ठत्व सांगतांना आचार्य शेवटी म्हणतात की स्थाणू अर्थात हालचाल न करणारा जुना खंबा किंवा निर्जीव दगड. तसे अत्यंत निश्चल असणाऱ्या भगवान शंकरांना स्थाणू म्हणतात. हिचा आश्रय केला तर असे स्थाणू भगवान शंकर देखील कैवल्य अर्थात परमानंद पदाला प्राप्त होतात.मग सामान्य सजीव वाट्टेल ते प्राप्त करेल यात आश्चर्य ते काय?



# श्रीशांकर स्तोत्ररसावली

विद्यावाचस्पती
प्रा. स्वानंद गजानन पुंड
९८२२६४४६११

४३) श्री आनंद लहरी ८
विधात्री धर्माणां त्वमसि सकलाम्नायजननी
त्वमर्थानां मूलं धनदनमनीयाङ्घ्रिकमले।
त्वमादि: कामानां जननि कृतकन्दर्पविजये
सतां मुक्तेर्बीजं त्वमसि परमब्रह्ममहिषी।।८।।

मानवी जीवनात प्राप्तव्य अशा चार अत्यंत श्रेष्ठ गोष्टींना पुरुषार्थ असे म्हणतात. अर्थ म्हणजे मिळवण्याची गोष्ट. पुरुष अर्थात जीवाने मिळवण्याच्या या चार गोष्टी. धर्म-अर्थ-काम-मोक्ष अशा या चारही पुरुषार्थांना प्रदान करणाऱ्या आई जगदंबेचे वैभव आचार्यश्री या श्लोकात वर्णन करीत आहेत.

विधात्री धर्माणां त्वमसि सकलाम्नायजननी- हे आई तू सर्व धर्मांची विधात्री अर्थात निर्माण कर्ती आहे. तू सकल आम्नाय अर्थात शास्त्रांची जननी आहेस. या दृष्टीने सर्व धर्माचे तू मूळ आहेस.

त्वमर्थानां मूलं
धनदनमनीयाङ्घ्रि
कमले- हे आई तू सर्व अर्थांचेही मूळ आहेस. धनद अर्थात कुबेर देखील वैभव प्राप्तीसाठी तुझ्या अंघ्री म्हणजे चरणकमलांचे वंदन करतो. कुबेराला देखील तूच वैभव प्रदान करते.

त्वमादि: कामानां जननि कृतकन्दर्पविजये - कंदर्प अर्थात मदन. त्याला आपल्या सौंदर्याने जिंकते ती कृतकन्दर्पविजया. अशी असणारी हे आई जगदंबे तू सर्व कामांची अर्थात इच्छांची जननी आहेस. काम शब्द मदनासाठी ही वापरतात आणि इच्छांसाठीही.

सतां मुक्तेर्बीजं त्वमसि परमब्रह्ममहिषी- हे परब्रह्म महिषी अर्थात परब्रह्माच्या सम्राज्ञी तू सर्व सज्जनांच्या मुक्तीचे बीज आहेस. अर्थात सिद्ध,योगी, मुनी मुक्तीसाठी तुझ्याच चरणाचा आश्रय घेतात.

अशारीतीने हे चारही पुरुषार्थ आई जगदंबेच्या चरणाशी प्राप्त आहेत. असेच आचार्यश्री येथे सुस्पष्ट करीत आहेत.



# श्रीशांकर स्तोत्ररसावली

विद्यावाचस्पती
प्रा. स्वानंद गजानन पुंड
९८२२६४४६११

४४) श्री आनंदलहरी -९

प्रभूता भक्तिस्ते यदपि न ममालोलमनस-
स्त्वया तु श्रीमत्या सदयमवलोक्योऽहमधुना।
पयोदः पानीयं दिशति मधुरं चातकमुखे
भृशं शंके कैर्वा विधिभिरनुनीता मम मतिः।।९।।

स्वतः कडे न्यूनत्व घेणे, स्वतःच्या अज्ञानाची कबुली देणे हे संतांचे वैभव आहे. जगद्गुरु आदि शंकराचार्य स्वामी महाराज येथे स्वतःच्या अशाच अल्पक्षमतेचे कथन आई जगदंबे च्या समोर करीत आहेत. असे असले तरी माझ्यासारख्या सामान्य जीवालाही ती सर्वस्व प्रदान करते हे सांगण्याची भूमिका त्यामागे आहे.

प्रभूता भक्तिस्ते यदपि न ममालोलमनसः- या पहिल्या ओळीतील ममालोलमनस हा शब्द व्यवस्थित समजून घ्यावा लागतो. अलोल शब्दाचा अर्थ स्थिर असा होतो. त्याला विरुद्धार्थी अ उपसर्ग लावला तर शब्द तयार होतो आलोल. त्याचा अर्थ चंचल.मग अर्थ लक्षात येतो की ममालोलमनस म्हणजे माझ्या अत्यंत चंचल मनात.

आचार्य म्हणतात, हे आई जगदंबे! माझ्या या अत्यंत चंचल मनात जरी तुझी प्रचुर भक्ती नाही तरी...

त्वया तु श्रीमत्या सदयमवलोक्योऽहमधुना ! आता हे परम बुद्धिशालिनी माते तू दयापूर्णरीतीने माझ्याकडे पाहिले आहेस.

त्यामुळे प्रसन्न तर वाटत आहे पण आता मला एकच काळजी आहे.

पयोदः पानीयं दिशति मधुरं चातकमुखे- पयोद अर्थात ढग चातकाच्या मुखात मधुर देत असतो. त्यासाठी चातक त्याला प्रार्थना करतो. मला मात्र ती प्रार्थना कशी करावी हेही समजत नाही.

भृशं शंके कैर्वा विधिभिरनुनीता मम मतिः- आई जगदंबे माझ्या बुद्धीने तुला कोणत्या विधीने प्रार्थना करावी? हीच माझी मोठी शंका आहे.

प्रार्थना करण्याएवढीही बुद्धी मला नाही असे मत आचार्य शरण जात आहेत.



# श्रीशांकर स्तोत्ररसावली

विद्यावाचस्पती
प्रा. स्वानंद गजानन पुंड
९८२२६४४६११

४५) श्री आनंद लहरी -१०

कृपापांगालोकं वितर तरसा साधुचरिते
न ते युक्तोपेक्षा मयि शरणदीक्षामुपगते।
न चेदिष्टं दद्यादनुपदमहो कल्पलतिका
विशेषः सामान्यैः कथमितरवल्लीपरिकरैः।।१०।।

आचार्यश्री आई जगदंबे ला प्रार्थना करीत आहेत की, कृपापांगालोकं वितर तरसा साधुचरिते- हे साधुचरिते अर्थात अत्यंत सुयोग्य वर्तन करणाऱ्या आई जगदंबे ! तू तुझ्या कृपारूपी दृष्टिपाताला माझ्यावर तरसा अर्थात अत्यंत शीघ्रपणे वितर अर्थात प्रदान कर.

तिने अशी कृपा का प्रदान करावी? याची मीमांसा करताना आचार्यश्री स्वतःचा शरणागतीचा आधार करीत म्हणतात,

न ते युक्तोपेक्षा मयि शरणदीक्षामुपगते।

आई मी तुझा शरणागतीची दीक्षा घेतली आहे. आता माझी उपेक्षा करणे तुला युक्त म्हणजे योग्य नाही.

आई जगदंबेला कल्पलतिका म्हणत आहेत. शास्त्रात कल्पवृक्ष, कामधेनु चिंतामणी रत्न इ. अद्भुत फलदायी गोष्टींचे वर्णन केले असते. मनात जी कल्पना येईल ती पूर्ण करणाऱ्या वृक्षाला कल्पवृक्ष म्हणतात. आईच्या स्त्रीत्वाचा विचार करीत आचार्य कल्पवृक्षाचे स्त्रीरूप म्हणून कल्पवल्ली, कल्पवेल म्हणत आहेत. तिच्या अशा स्वरूपाचे वैभव

सांगत आचार्य श्री म्हणतात,

न चेदिष्टं दद्यादनुपदमहो कल्पलतिका ! जर अनुपद अर्थात प्रत्येक पावलावर कल्पलतिका इष्ट म्हणजे अपेक्षित गोष्ट देणार नाही. तर मग..

विशेषः सामान्यैः कथमितरवल्लीपरिकरैः:- इतर सामान्य वेलींमध्ये आणि तिच्यामध्ये विशेष असा फरकच काय उरला?

सावली,पाने, फुले, फळे या गोष्टी तर सामान्य वेलही देते. या सर्व गोष्टींनीही एक प्रकारचा आनंद मिळतो.पण या सर्व लौकिक गोष्टी आहेत. आनंद ही लौकिक आहे. आई जगदंबा कल्पवल्ली आहे. तिची कृपा अलौकिक असते असेच आचार्य यातून सुचवत आहेत.



# श्रीशांकर स्तोत्ररसावली

विद्यावाचस्पती
प्रा. स्वानंद गजानन पुंड
९८२२६४४६११

४६) श्री आनंद लहरी-११

महान्तं विश्वासं तव चरणपंकेरुहयुगे
निधायान्यन्नैवाश्रितमिह मया दैवतमुमे।
तथापि त्वच्चेतो यदि मयि न जायेत सदयं
निरालम्बो लम्बोदरजननि कं यामि शरणम्।।११।।

आई जगदंबेच्या चरणी असलेली आपली अनन्य शरणता आचार्य श्री येथे आर्तपणे सादर करीत आहेत. भक्ताच्या भक्तीचे ते सगळ्यात महत्त्वाचे लक्षण आहे. भक्ती ही पतिव्रतेसमान एकनिष्ठ असायला हवी. या अनन्यशरणतेने आचार्यश्री म्हणतात,

महान्तं विश्वासं- माझा परम विश्वास, परिपूर्ण विश्वास आता एकाच जागी स्थिरावला आहे. ती जागा कोणती? म्हणशील तर,

तव चरणपंकेरुहयुगे- तव म्हणजे तुझे . पंके म्हणजे चिखलात. रुह म्हणजे उगवणारे.अर्थात कमळ. तर युग म्हणजे जोडी. अर्थात आई जगदंबे! कमळाप्रमाणे सुकुमार असणाऱ्या तुझ्या दोन चरणांवरच माझा ठाम विश्वास आहे. अविचल श्रद्धा आहे. त्यामुळेच,

निधायान्यन्नैवाश्रितमिह मया दैवतमुमे- हे उमे अर्थात देवी पार्वती ! तुझ्या या चरणांना निधाय अर्थात सोडून मी इह अर्थात या जगात अन्य कशालाही शरण गेलेलो नाही. तुझ्यावरच्या पूर्ण विश्वासामुळे मला अन्य कोणाकडे पाहण्याची आवश्यकताच नाही.

तथापि त्वच्चेतो यदि मयि न जायेत सदयं- तथापि अर्थात असा अनन्य शरण असतानां देखील जर त्वचेतो अर्थात तुझे मन माझ्याबद्दल सदय म्हणजे दयापूर्ण झाले नाही तर,

निरालम्बो लम्बोदरजननि कं यामि शरणम्- हे लंबोदर जननी ! श्रीगणेशांच्या अनेक अवतारांच्या माते ! निरालंब अर्थात आश्रय रहित झालेला मी,कं यामि शरणम् ? म्हणजे कोणाला शरण जाऊ? ते तूच सांग.

मला आता तुझ्या शिवाय अन्य शरणागती नाही हेच आचार्यश्री निसंदिग्धपणे वर्णन करीत आहेत.



# श्रीशांकर स्तोत्ररसावली

विद्यावाचस्पती
प्रा. स्वानंद गजानन पुंड
९८२२६४४६११

## ४७) श्री आनंदलहरी -१२

अय: स्पर्शे लग्नं सपदि लभते हेम पदवीं
यथा रथ्यापाथ: शुचि भवति गंगौघमिलितम्।
तथा तत्तत्पापैरतिमलिनमन्तर्मम यदि
त्वयि प्रेम्णासक्तं कथमिव न जायेत विमलम्।।१२।।

आई जगदंबेच्या भक्तीमध्ये रत झाल्याचा परिणाम किती रमणीय असतो हे सांगताना आचार्यश्री, परीसस्पर्श तथा गंगा स्पर्शाचे उदाहरण देत म्हणतात,

अय: स्पर्शे लग्नं सपदि लभते हेमपदवीं- अयस् म्हणजे लोखंडाला जेव्हा क्षणभराकरता देखील परिसाचा स्पर्श होतो त्यावेळी सपदी म्हणजे तत्काल ते लोखंड सोने या पदवीला प्राप्त होते. अर्थात त्याचे सोन्यात रूपांतर होते. त्याची लोखंड रुपातील अल्पमूल्यता, हिणकसता पूर्णपणे लोप पावते. ते अनमोल होऊन जाते. त्याचप्रमाणे,

यथा रथ्यापाथ: शुचि भवति गंगौघमिलितम्- जसे रथ्यापाथ अर्थात रस्त्यावरून वाहणारे पाणी कितीही अस्वच्छ गोष्टींना स्पर्श करीत वाहिले. त्या सगळ्यांना सोबत घेऊन वाहत राहिले तरी गंगौघाला, गंगेच्या प्रवाहाला मिळताच शुद्ध होऊन जाते.

तथा म्हणजे त्याप्रमाणे, तत्तत्पापैरतिमलिनमन्तर्मम- त्या त्या वेळी केलेल्या त्या त्या पापांनी माझे मन अत्यंत मलीन झालेले असले तरी,

त्वयि प्रेम्णासक्तं- हे आई जगदंबे आता ते मन तुझ्या प्रेमात आसक्त झाले असल्यावर,

कथमिव न जायेत विमलम्? आता ते शुद्ध कसे होणार नाही?

अर्थात परिसस्पर्शाने लोखंडाचे सोने व्हावे, गंगा स्पर्शाने गटारालाही ही पावित्र्य यावे तसे तुझ्या स्मरणाने माझे पापी मन शुद्ध होत आहे. माझ्या जीवनाचे सोने होत आहे. माझ्या मनाला गंगा जलाचे पावित्र्य येत आहे असे आचार्यश्री म्हणत आहेत.

खरेतर त्यांच्या मनाला पापाचा स्पर्शही नाही. पण या निमित्ताने आपल्या सगळ्यांच्या उद्धाराचा मार्ग ते सांगत आहेत.



## श्रीशांकर स्तोत्ररसावली

विद्यावाचस्पती
प्रा. स्वानंद गजानन पुंड
९८२२६४४६११

४८) श्री आनंद लहरी १३

त्वदन्यस्मादिच्छाविषयफललाभे न नियम-
स्त्वमर्थांनामिच्छाधिकमपि समर्थां वितरणे।
इति प्राहु: प्राञ्च: कमलभवनाद्यास्त्वयि मन-
स्त्वदाससक्तं नक्तं दिवमुचितमीशानि कुरु तत्।।१३।।

आई जगदंबेच्या अद्वितीय वैभवाचे वर्णन करताना शंकराचार्य स्वामी महाराज म्हणतात,

त्वदन्यस्मादिच्छाविषयफललाभे न नियम:- आई त्वदन्यत् म्हणजे तुझ्यापेक्षा भिन्न कोणाकडूनही, अस्मद् इच्छा विषय म्हणजे आमच्या मनात येणारे विषय, इच्छा, आशा आकांक्षा, फललाभे अर्थात फलद्रूप होण्याच्या बाबतीत, पूर्ण होण्याच्या बाबतीत, न नियम: अर्थात निश्चित असा नियम नाही. कदाचित या पूर्ण होतील किंवा कदाचित होणार देखील नाहीत. खात्रीने पूर्ण होतीलच असा नियम नाही. वेगळ्या शब्दात अन्य देवता परिपूर्ण मनोवांछित प्रदान करण्यात कदाचित समर्थ असतील किंवा नसतील, पण आई जगदंबे तुझ्या बाबतीत बोलायचे तर,

त्वमर्थांनामिच्छाधिकमपि समर्थां वितरणे। तू मात्र मागणी करणाऱ्यांच्या इच्छां पेक्षा देखील अधिक प्रदान करण्यास समर्थ आहेस.

आपल्या बोलण्याला आधार देण्यासाठी आचार्य श्री म्हणतात हे मीच म्हणतो असे नाही तर,

इति प्राहु: प्राञ्च: कमलभवनाद्या:- हात जोडून उभे असलेले, कमलभवन म्हणजे भगवान ब्रह्मदेव. आदी म्हणजे विष्णु, शंकर इत्यादी देखील इति प्राहु: अर्थात असेच म्हणत असतात. त्यांच्याही सगळ्या इच्छा तूच पूर्ण करतेस.

त्वयि मन-

स्त्वदासक्तं- माझे मन तुझ्याच ठायी आसक्त झाले आहे. नक्तं म्हणजे रात्र तर दिवं म्हणजे दिवस. अर्थात ही म्हण रात्रंदिन तुझ्याच चरणी लीन आहे. आता मला अन्य शरणस्थान नाही. आता तूच काय तो विचार कर आणि उचितमीशानि कुरु तत्- हे ईशानी, परमेश्वरी तूच उचित म्हणजे योग्य काय ते कर.



# श्रीशांकर स्तोत्ररसावली

विद्यावाचस्पती
प्रा. स्वानंद गजानन पुंड
९८२२६४४६११

४९) श्री आनंद लहरी १४

स्फुरन्नानारत्नस्फटिकमयभित्तिप्रतिफल-
त्त्वदाकारं चंचच्छशधरकलासौधशिखरम्।
मुकुन्दब्रह्मेन्द्रप्रभृतिपरिवारं विजयते
तवागारं रम्यं त्रिभुवनमहाराजगृहिणि।।१४।।

आई जगदंबेच्या अद्वितीय घराचे वर्णन करताना आचार्य श्रींची प्रतिभा या श्लोकात उत्तुंग झेप घेत आहे. ते म्हणतात

स्फुरन्नानारत्नस्फटिकमयभित्तिः- आई तुझा भवनाच्या भिंती या तेजाने लखलखणाऱ्या स्फटिक इत्यादी रत्नानी जडलेल्या आहेत.

प्रतिफलत्त्वदाकारं चंचल् - हे पुढचे वर्णन अधिक रोमांचकारी आहे. भिंतींना रत्न जडवले आहे त्यात वैशिष्ट्य नाही त्या प्रत्येक रत्नात आई तुझे प्रतिबिंब दिसत आहे. जणू त्यामुळेच ती रत्ने चमकत आहेत. ती रत्ने जड, अचेतन न उरता तुझ्या प्रतिबिंबांच्या चैतन्याने युक्त, चंचल् झालेली आहेत .

शशधरकलासौधशिखरम्- या भवनाच्या उज्वलतेचे कार्य भगवान श्री चंद्र सांभाळत आहेत. शश म्हणजे ससा. तो ज्याने अंगावर धारण केला आहे तो शशधर. त्याच्या कला. त्याच्या प्रकाशाने आई जगदंबेच्या महालाचे सौध शिखर म्हणजे गच्चीवरचा भाग उजळून निघालेला आहे.

मुकुन्दब्रह्मेन्द्रप्रभृतिपरिवारं - घराचे वैभव केवळ बाह्य सौंदर्यात नाही तर तेथे राहणाऱ्या लोकात आहे. आईच्या घरात मुकुंद म्हणजे भगवान विष्णू, ब्रह्म म्हणजे भगवान ब्रह्मदेव, इंद्र अर्थात देवराज असा अतिदिव्य परिवार आहे. ते खरे वैभव आहे.

विजयते तवागारं रम्यं त्रिभुवनमहाराजगृहिणि- अशा अद्वितीय घरात रहात असल्यामुळे तू महाराजगृहिणी आहेस. संपूर्ण त्रैलोक्यात रम्य असणाऱ्या तुझ्या या घराचा विजय असो.



# श्रीशांकर स्तोत्ररसावली

विद्यावाचस्पती
प्रा. स्वानंद गजानन पुंड
९८२२६४४६११

५०) श्री आनंद लहरी १५

निवासः कैलासे विधिशतमखाद्याः स्तुतिकराः
कुटुम्बं त्रैलोक्यं कृतकरपुटः सिद्धिनिकरः।
महेशः प्राणेशस्तदवनिधराधीशतनये
न ते सौभाग्यस्य क्वचिदपि मनागस्ति तुलना।।१५।।

आई जगदंबेच्या संसारातील प्रत्येकच गोष्ट अद्वितीय आहे.

आईच्या या लोकोत्तर संसाराचे अधिक वर्णन करताना आचार्य म्हणतात,

निवासः कैलासे- आईचे हे निवासस्थान कैलासावर आहे. इथे एक वेगळीच गोष्ट समजून घ्यायला हवी. कैलासाला जाणे याचा अर्थ सामान्य माणसाचा संसार संपणे. जिथे सगळ्या जगाचा संसार संपतो तेथे आईचा संसार आरंभ होतो.

कैलासात इतरांचा संसार राखरांगोळी होतो. मात्र आईचा संसार त्या कैलासात फुलतो. हेच तिचे लोकविलक्षणत्व आहे.

विधिशतमखाद्याः स्तुतिकराः- विधी अर्थात भगवान ब्रह्मदेव. शतमख म्हणजे शंभर यज्ञ. शंभर अश्वमेध यज्ञ केल्यावर देवांचे राजपद प्राप्त होत असते. असे स्वर्गाधीश पद प्राप्त झालेले इंद्र. हेच या आईचा भवनातील स्तुतिपाठक आहेत.

कुटुम्बं त्रैलोक्यं- संपूर्ण त्रेलोक्य हेच आईचे कुटुंब आहे.

कृतकरपुटः सिद्धिनिकरः- सर्व ६४ कोटी अर्थात् ६४ प्रकारच्या सिद्धींचा निकर म्हणजे समूह कृतकरपुटः म्हणजे आई जगदंबेच्या समोर सेविका रूपात हात जोडून उभा असतो.

महेशः प्राणेशः- भगवान महेश अर्थात श्री शंकर हे तुझे प्राणेश्वर, पती परमेश्वर आहेत.

अवनिधराधीशतनये- अवनी अर्थात पृथ्वी, ती सगळ्यांना धारण करते त्यामुळेच तिला धरा असे म्हणतात. त्या धरेला धारण करणारा पर्वत म्हणजे धराधर. त्या हिमालयाची कन्या असल्यामुळे आईला अवनिधराधीशतनया असे म्हणतात.

न ते सौभाग्यस्य क्वचिदपि मनागस्ति तुलना- आई अशा अद्वितीय गोष्टींमुळे तुझ्या संसाराला, सौभाग्याला या जगात तुलनाच नाही.



# श्रीशांकर स्तोत्ररसावली

विद्यावाचस्पती
प्रा. स्वानंद गजानन पुंड
९८२२६४४६११

५१) श्री आनंद लहरी १६

वृषो वृद्धो यानं विषमशनमाशा निवसनं
श्मशानं क्रीडाभूर्भुजगनिवहो भूषणविधि:।
समग्रा सामग्री जगति विदितैवं स्मररिपो-
र्यदेतस्यैश्वर्यं तव जननि सौभाग्यमहिमा।।१६।।

या श्लोकात आचार्यश्रींची प्रतिभा एका वेगळ्याच विषयाला स्पर्श करते. आरंभीच्या तीन ओळीत भगवान शंकरांचे वर्णन आहे. हे वर्णन काहीसे नकारात्मक म्हणता येईल. मात्र त्या नकारात्मकतेच्या आधारे आचार्यश्री चौथ्या ओळीत आई जगदंबेचे वैभव स्पष्ट करीत आहेत.

कशी आहे भगवान शंकरांची अवस्था? आचार्यश्री म्हणतात,

वृषो वृद्धो यानं - त्यांना फिरण्या करता वाहन म्हणून एक म्हातारा बैल आहे.

विषमशनम्- अशन म्हणजे खाणे. खाण्यासाठी जवळ विष आहे.

आशा निवसनं- आशा शब्द येथे दिशे साठी वापरला आहे. आशा संपत नाहीत तसा दिशांना अंत नाही. त्या दिशा म्हणजे दिग् हेच ज्यांचे अंबर म्हणजे वस्त्र ते दिगंबर.

श्मशानं क्रीडाभू- क्रीडे ची अर्थात राहण्याची जागा कोणती तर स्मशान.

भुजगनिवहो भूषणविधि:- त्यांनी आभूषण अंगावर सर्प धारण केले आहेत.

अशाप्रकारे स्मररिपू अर्थात मदनाचे शत्रु असणाऱ्या भगवान शंकरांची, समग्रा सामग्री जगति विदितैवं - समग्र वैभवशाली संपत्ती सगळ्या जगाला माहीतच आहे. अर्थात त्यांच्याजवळ सांगण्यासारखे काहीच वैभव नाही.

मात्र असे असले तरी त्यांना महादेव म्हटल्या जाते. ते का? याचे कारण विशद करताना आचार्यश्री म्हणतात, यदेतस्यैश्वर्यं तव जननि सौभाग्यमहिमा- हे आई जगदंबे हा सर्व तुझ्या सौभाग्याचा महिमा आहे.

तू सोबत आहे म्हणून त्या स्मशानवासीला लोक शिव अर्थात पवित्र म्हणतात.



# श्रीशांकर स्तोत्ररसावली

विद्यावाचस्पती
प्रा. स्वानंद गजानन पुंड
९८२२६४४६११

५२) श्री आनंद लहरी १७

अशेषब्रह्माण्डप्रलयविधिनैसर्गिकमति:
श्मशानेष्वासीन: कृतभसितलेप: पशुपति:।
दधौ कण्ठे हालाहलमखिलभूगोलकृपया
भवत्या: संगत्या: फलमिति च कल्याणि कलये।।१७।।

भगवान श्री शंकरांचे केवळ बाह्यरंगच नव्हे तर अंतरंग देखील आपल्यासाठी तितकेच भयावह आहे हे सांगत असताना आचार्य श्री म्हणतात,

अशेषब्रह्माण्डप्रलयविधिनैसर्गिकमति:- अशेष म्हणजे या संपूर्ण, ब्रम्हांडाचा प्रलय म्हणजे विनाशाची, विधी म्हणजे पद्धती, त्यांची नैसर्गिक मती अर्थात स्वाभाविक प्रवृत्ती आहे. अर्थात त्यांच्या मनात सतत या विश्वाच्या विनाशाचा विचार चालत असतो. तेच त्यांचे कार्य आहे.

श्मशानेष्वासीन: - यासाठीच भगवान शंकर स्मशानात निवास करतात. कारण सामान्य जीवनाच्या दृष्टीने त्याच्या जीवनाचा विनाश येथेच होत असतो. समष्टीच्या प्रलयाची ही देवता व्यष्टि प्रलयाचे स्थान असणाऱ्या स्मशानात निवास करते.

कृतभसितलेप: - अंगाला ते भस्माचा लेप लावून बसलेले असतात. तेही सामान्य नव्हे तर चिताभस्म.

पशुपति:- पशुपती शब्दाचा सामान्य अर्थ नंदी वर बसणारे होतो. पण पशु शब्द जीव अर्थाचा असल्याने सकल जीवांचे अधिपती म्हणजे पशुपती. पण ते त्या जीवांच्या विनाशस्थळी आहेत.

मात्र असे असले तरी,

दधौ कण्ठे हालाहलमखिलभूगोलकृपया- सकल विश्वाच्या विनाशाचाच विचार करणाऱ्या त्या भगवान शंकरांनी सगळ्या जगावर कृपा करण्यासाठी आपल्या कंठात हलाहल विष धारण केले.

वास्तविक त्यांची ही कृती त्यांच्या मूळ स्वरूपाच्या विपरीत आहे. जगाचा विनाश करणारे ते विष त्यांनी स्वत:च्या कंठात धारण केले.

काय कारण असावे? आचार्य श्री म्हणतात, त्यांच्यात आलेली ही कृपाळू कृती म्हणजे,

भवत्या: संगत्या: फलमिति च कल्याणि कलये- हे कल्याणी! हे तुझ्या संगतीचे फल आहे. तुझ्या संगती मुळे ते विश्व विनाशक विश्व रक्षक ठरतात. हे तुझे माहात्म्य आहे.



# श्रीशांकर स्तोत्ररसावली

विद्यावाचस्पती
प्रा. स्वानंद गजानन पुंड
९८२२६४४६११

५३) श्री आनंद लहरी १८

त्वदीयं सौन्दर्यं निरतिशयमालोक्य परया
भियैवासीद्गंगा जलमयतनु: शैलतनये।तदेतस्यास्तस्माद्वदनकमलं वीक्ष्य कृपया
प्रतिष्ठामातन्वन्निजशिरसिवासेन गिरिश:।।१८।।

आई जगदंबेचा लोकोत्तर सौंदर्याचे वर्णन करण्यासाठी पूज्यपाद आचार्यश्री येथे एक वेगळाच मार्ग अवलंबित आहेत. त्यांनी त्यासाठी भगवान शंकरांच्या मस्तकावर असणाऱ्या गंगेला आधार केले आहे. ते म्हणतात,

त्वदीयं सौन्दर्यं निरतिशयमालोक्य परया
भियैवासीद्गंगा जलमयतनु: शैलतनये।

हे शैल अर्थात पर्वत तनये पार्वती ! तुझ्या निरतिशय अर्थात सर्वाधिक अद्वितीय सौंदर्याला पाहून आपले सौंदर्य यापुढे काहीच नाही असा विचार मनात आल्याने, आपल्या सौंदर्याच्या पराभवाच्या भीतीने देवी गंगा जलमयतनु म्हणजे पाण्याचा देह धारण केलेली झाली. वेगळ्या शब्दात लाजून तिचे पार पाणी पाणी झाले. यामुळेच मूळ देवता रूप असलेली गंगा जलमय होऊन नदीरूपात वाहू लागली.

अर्थात आई आदिशक्तीच्या सौंदर्याने देवी गंगेचे असे पारिपत्य झाले असले तरी भगवान शंकरांना ती देखील तितकीच प्रिय आहे. तिच्या पराभवाने तिची झालेली अवस्था पाहून त्यांचे मन द्रवित झाले. तिला सन्मान प्राप्त व्हावा म्हणून त्यांनी एक वेगळाच प्रयोग केला. आचार्य श्री म्हणतात,

तदेतस्यास्तस्माद्वदनकमलं वीक्ष्य कृपया- तिचे मुखकमल अशा रीतीने अत्यंत म्लान झालेले पाहून, तिच्यावर कृपा निर्माण झालेल्या, तिची दया आलेल्या,

प्रतिष्ठामातन्वन्निजशिरसिवासेन गिरिश:- भगवान गिरीश म्हणजे शंकरांनी तिला प्रतिष्ठा प्राप्त व्हावी म्हणून आपल्या मस्तकावर धारण केले.

जणू थोडे वरचे स्थान देऊन तिचा सौंदर्य पराभवाने गेलेला गौरव वाढविला.



# श्रीशांकर स्तोत्ररसावली

विद्यावाचस्पती
प्रा. स्वानंद गजानन पुंड
९८२२६४४६११

५४) श्री आनंद लहरी १९

विशालश्रीखण्डद्रवमृगमदाकीर्णघुसृण-
प्रसूनव्यामिश्रं भगवति तवाभ्यंगसलिलम्।
समादाय स्रष्टा चलितपदपांसून्निजकरै:
समाधत्ते सृष्टिं विबुधपुरपंकेरुहदृशाम्।।१९।।

खरे वैभव ते, जे इतरांना वैभवसंपन्न करते. खरे श्रेष्ठत्व ते जे इतरांना श्रेष्ठत्व प्रदान करते. त्याच प्रमाणे खरे सौंदर्य ते जे इतरांना सौंदर्य प्रदान करते. आई जगदंबेच्या अशा सौंदर्याचे वर्णन करताना आचार्यश्री प्रथम तिच्या स्नानासाठी केलेल्या तयारीचे वर्णन करीत आहेत.

विशालश्रीखण्डद्रवमृगमदाकीर्णघुसृण-

प्रसूनव्यामिश्रं भगवति तवाभ्यंगसलिलम्- येथे विशाल हा शब्द भरपूर, प्रचुर या अर्थाने आला आहे. श्रीखंड म्हणजे चंदन. त्याचा द्रव अर्थात एकतर चंदनाचे तेल किंवा चंदनाची उगाळलेली उटी. मृगमद म्हणजे कस्तुरी. चंदन आणि कस्तुरीच्या कणांनी सुगंधित केलेले. प्रसून शब्दाचा अर्थ आहे पुष्प. कुसुम. व्यामिश्र म्हणजे वेगवेगळ्या प्रकारचे. तर अभ्यंगसलील म्हणजे स्नानाकरिता काढलेले गरम पाणी. सगळ्याचा एकत्रित अर्थ करता, हे भगवती आई जगदंबे तुझ्या स्नाना करिता काढलेले गरम पाणी चंदन आणि कस्तुरीच्या कणांनी सुगंधित केले असून त्यात विविध फुले विखुरली आहेत.

समादाय- अशा तुझ्या स्नानाने अधिकच पवित्र झालेल्या जलाला गोळा करून, चलितपदपांसून्निजकरै:- असे स्नान करून स्नानगृहातून निघाल्यानंतर तुझ्या पावलाने पवित्र झालेली धूळ आपल्या हाताने गोळा करून,

समाधत्ते सृष्टिं विबुधपुरपंकेरुहदृशाम्- विबुधपुर अर्थात स्वर्गातील अप्सरा अशा पंक म्हणजे या सर्व सुगंधित द्रव्यांनी अधिकच सुगंधित झालेल्या तुझ्या चरणधूलीने आपले सौंदर्य प्रसाधन करतात.

त्यांना सौंदर्यासाठी तुझ्या चरणकमलांची धूलीच साधन ठरते. हे तुझे सौंदर्य महात्म्य होय.